**श्री. डी. एम. राजे (श्री. दिवाकर मोरेश्वर राजे),**
**सहनिबंधक सहकारी संस्था (निवृत्त) यांच्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक न्यायाप्र २०१७/ प्र. क्र ७/ ५ स**
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक १७ ऑक्टोबर, २०१८.

<u>वाचा</u>:- शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. राजस २५९२/१२५५१/प्र.क्र. ३१८/ ५ स, दिनांक ५/१/१९९५

**प्रस्तावना-**

श्री. डी. एम. राजे (श्री. दिवाकर मोरेश्वर राजे), विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, नागपूर हे नागपूर कृषी उत्पन्न बाजार समिती, नागपूर येथे सचिव या पदावर परसेवेवर कार्यरत होते. श्री.राजे हे दि.३१/५/१९९२ रोजी सदर परसेवेवरील पदावरून नियतवयोमानानुसार सेवानिवृत्त झाले आहेत. श्री.राजे यांनी सेवानिवृत्ती नंतर कृषी उत्पन्न बाजार समिती, नागपूर येथे वाणिज्यीक नोकरी स्वीकारली. अशी नोकरी स्विकारताना त्यांनी महाराष्ट्र नागरी सेवा (सेवानिवृत्ती) नियम १९८२ च्या नियम १६३ (१) नुसार शासनाची पूर्वपरवानगी घेतली नाही. तसेच ते स्वीकारत असलेला मेहनताना नियमानुसार नसल्यामुळे शासनाने त्यांना कारणे दाखवा नोटिसा दिल्या होत्या. तथापि, त्याबाबत अंतिम निर्णयाची वाट न पाहता श्री .राजे यांनी मा.महाराष्ट्र प्रशासकिय न्यायाधिकरण,नागपूर खंडपीठ, नागपूर येथे क्र.४१९/१९९३ अन्वये मूळ अर्ज दाखल केला होता.

श्री. राजे यांनी, दाखल केलेल्या मुळ अर्जास अनुसरून, मा. न्यायाधिकरणाने दिनांक १९/६/२००२ रोजी दिलेल्या निर्णयास अनुसरून दिनांक ५/१/१९९५ नुसार पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्याबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आले--

अ) श्री.राजे यांची अंतिम वेतनाचे मर्यादेत निवृत्ती वेतनाची रक्कम विचारात घेवून त्यांचे दिनांक १/६/१९९२ पासूनचे वाणिज्यिक सेवेतील वेतन निर्गमीत करण्यात यावे.

ब) दि.१/६/१९९२ पासून या आदेशाच्या दिनांकापर्यत श्री राजे यांना देण्यात आलेले व अतिरिक्त ठरणारे आर्थिक लाभाची फरकाची रक्कम यापुढे माहेवार हप्ता निश्चित करून प्रत्येक महिन्यात वसूल करून शासकिय कोषागारात भरणा करावी व या कार्यवाहीची जबाबदारी नागपूर कृषी उत्पन्न बाजार समिती,नागपूर व व्यक्तिश: श्री. राजे यांची संयुक्तीक राहिल.

क) श्री.राजे यांनी वाणिज्यिक नोकरी सोडल्यास नोकरी सोडण्याच्या दिनांकाला त्यांचेकडे वसूली प्रित्यर्थ बाकी असलेली रक्कम त्यांनी एक रकमी शासनाच्या कोषगारात चलनाने भरणा करावी.

श्री.राजे यांनी दिनांक ५/१/१९९५ च्या शासन निर्णयाच्या विरूध्द मा.उच्च न्यायालय नागपूर येथे क्र.८६३/२००२ अन्वये अपिल याचिका दाखल केली. श्री. राजे यांनी मा. उच्चा न्यायालय, नागपूर येथे दाखल केलेल्या अपिल अर्जावर मा. न्यायालयाने दिनांक २०/७/२०१७ चे आदेशान्वये खालील प्रमाणे न्यायनिर्णय दिला आहे.

" The judgement and order dated ३/१/२००२ passed by Maharashtra Administrative Tribunal in Original Application No.४१९/१९९२ is hereby quashed and set aside. The order dated ५/१/१९९५ passed by the State Government to the extent it propose to recover the amount of pension paid to the petitioner and to make adjustments cannot be sustained and the same is therefore quashed and set aside. The respondents shall continue to pay the regular full pension to the petitioner upon his superannuation with effect from ३१/५/१९९२"

मा.उच्च न्यायालयाने दिनांक २०/७/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाबाबत सरकारी वकील मा. उच्च न्यायालय नागपूर यांनी त्यांच्या दिनांक२/१२/२०१७ रोजीच्या पत्रान्वये " Government may prefer Special Leave Petition before the Hon'ble Supreme Court of India. Hower,final decision is in respect of may be taken by the department level." असे अभिप्राय दिले आहेत.

मा. मा.उच्च न्यायालय नागपूर यांनी दिनांक२०/७/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाबाबत विधी व न्याय विभाग,नागपूर यांनी दिलेल्या मान्यतेनुसार सरकारी वकील , मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांना मा. सर्वोच्च न्यायालय येथे अपिल दाखल करण्याबाबत दिनांक १/३/२०१८ च्या पत्रान्वये कळविण्यात आले आहे.

त्यांसदर्भात, मा. सर्वोच्च न्यायालयाचे सरकारी वकील यांनी त्यांच्या दिनांक २०/६/२०१८ च्या पत्रानुसार "I hereby opine that no purpose will be served in filing a Special Leave Petition as per the instructions issued vide above reference no. १ letter. (शासनाचे दिनांक १/३/२०१८ चे पत्र) You are requested to withdraw the said instructions" असे अभिप्राय दिले आहेत.

मा. सर्वोच्च न्यायालयाचे सरकारी वकील यांनी दिलेल्या अभिप्रायास अनुसरून विधी व न्याय विभाग, नागपूर यांनी "Considering the remarks of Co-operation Department and opinion of Govt. Advocate, Supreme Court, New Delhi, if approved, instructions for filling SLP in this matter may be withdrawn." असे अभिप्राय दिले असून त्याप्रमाणे विधी व न्याय विभाग, नागपूर यांनी त्यांच्या दिनांक २५/९/२०१८ च्या पत्रान्वये शासकीय अभियोक्ता, मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांना त्यांच्या दिनांक २०/२/२०१८ च्या पत्रान्वये दाखल केलेली SLP मागे घेण्यास कळविले आहे.

उपरोक्तमुळे, श्री. राजे यांच्या संदर्भात मा. सर्वोच्च्ा न्यायालय, नवी दिल्ली येथे अपिल दाखल करण्यासंबंधातील प्रकरणावर पुढील कार्यवाहीची आवश्यकता नसल्यामुळे , मा. उच्च्ा न्यायालयाच्या निर्णयानुसार श्री. राजे यांच्या संदर्भात आदेश निर्गमित करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

**श्री. डी. एम. राजे (श्री. दिवाकर मोरेश्वर राजे ), सेवानिवृत्त यांचे संदर्भातील दिनांक ५/१/१९९५ रोजीचा शासननिर्णय याव्दारे रद्द करण्यात येत आहे.**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१८१०१७१४५४१४०४०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Manjiri Ganeshbhushan Joshi

Digitally signed by Manjiri Ganeshbhushan Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=91b4708db2a52d675f7f30d81444f3844833dfc7c86d4244ee1075c97c713180, serialNumber=7d5731d128ab41d6a090557a2e9658b7382ac03af6e239ba66cc1cf9a6cf2f52, cn=Manjiri Ganeshbhushan Joshi
Date: 2018.10.17 14:59:27 +05'30'

**( मं. ग. जोशी)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे

२. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे

३. विभागीय सहनिबंधक सहकारी संस्था, नागपूर
४. जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था, नागपूर
५. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
६. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
७. सामान्य प्रशासन विभाग ( १३), मंत्रालय, मुंबई
८. वित्त विभाग (सेवा ७), मंत्रालय,मुंबई
९. चेअरमन, नागपूर कृषि उत्पन्न बाजार समिती, नागपूर ४४० ००८
१०. श्री. डी. एम. राज ( श्री. दिवाकर मोरेश्वर राजे), सहनिबंधक सहकारी संस्था (निवृत्त)
(व्दारा नागपूर कृषि उत्पन्न बाजार समिती, नागपूर ४४० ००८)
११. निवड नस्ती ५ स